सन २०२३-२४ टंचाई अंतर्गत लातूर जिल्हयातील लातूर तालुक्यातील मौजे खंडापूर येथील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०२४/प्र.क्र. ४९/पापु १४**

जी. टी. रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ८ मे, २०२४

वाचा-

१) शासननिर्णय,पाणी पुरवठा व स्वच्छता विभागक्रमांक: टंचाई १०९९/प्र.क्र. १२/पापु १४, दिनांक ३.२.१९९९
२) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभागक्रमांक: टंचाई २०१८/प्र.क्र.२०/पापु १४, दिनांक १४.०२.२०१८
३) जिल्हाधिकारी, लातूर यांचे पत्र क्रमांक जा.क्र. २०२४/ महसूल/ टंचाई/कावी-३२७ दिनांक २६.०४.२०२४.

प्रस्तावना-

जिल्हाधिकारी, लातूर यांनी सन २०२३-२४ च्या टंचाई कालावधीसाठी तातडीच्या पाणी पुरवठा योजनेंतर्गत मौजे खंडापूर, ता. लातूर, जिल्हा लातूर येथील तात्पुरती पुरक नळ पाणी पुरवठा योजनेचा रुपये १२,१०,४००/- किंमतीचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे..

राज्यात कमी पर्जन्यनामामुळे दुष्काळी / दुष्काळसदृश्य परिस्थिती निर्माण झाली असून त्यामुळे राज्यात ब-याच ठिकाणी भीषण पाणीटंचाई उद्भवली आहे. महसूल व वन विभागाने (मदत व पुनर्वसन) दिनांक १०.११.२०२३ व १६.०२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये लातूर जिल्हयात दुष्काळ सदृश्य परिस्थिती घोषित करण्यात आली आहे. सदर वस्तुस्थिती, भारत निवडणूक आयोगाच्या दिनांक ०२.०१.२०२४ रोजीच्या पत्रातील मार्गदर्शक सूचना अ.क्र. III (i) तसेच, दुष्काळ व्यवस्थापन संहिता, २०१६ मधील प्रकरण-४ नुसार सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासननिर्णय-**

जिल्हाधिकारी, लातूर यांनी मौजे खंडापूर, तालुका लातूर, जिल्हा लातूर येथील तात्पुरती पुरक नळ पाणी पुरवठा योजनेला प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. ३ च्या पत्रासोबत शासनास सादर केलेला आहे. सदर प्रस्तावात नमुद मौजे खंडापूर, तालुका लातूर, जिल्हा लातूर येथील तात्पुरती पुरक नळ पाणी पुरवठा योजनेच्या रुपये १२,१०,४००/- ( अक्षरी रुपये बारा लाख दहा हजार चारशे फक्त ) किंमतीच्या प्रस्तावास "विशेष बाब" म्हणून खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) सदर प्रस्तावात नमूद केलेली पूरक पाणी पुरवठा योजना कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, लातूर यांचेमार्फत राबविण्यात यावी.
२) सदर योजनेची कामे विहित पध्दतीने ई-निविदा मागविण्यात येऊन करावीत.
३) योजनेचे काम मान्यता प्राप्त किंमतीमध्येच पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.
४) योजनेची निविदा अल्प मुदतीची (०७ दिवस) काढण्यास परवानगी देण्यात येत आहे.
५) निविदा प्रक्रीया दिनांक १६ मे, २०२४ पर्यंत पूर्ण करुन कार्यारंभ आदेश देणे आवश्यक आहे.
६) निविदा प्रक्रीया दिनांक १६ मे, २०२४ पर्यंत पूर्ण करण्यात यावी.
७) योजनेची कामे दिनांक १६ जून, २०२४ पर्यंत पूर्ण करुन योजनेतून पाणी पुरवठा सुरु होणे आवश्यक आहे.
८) सदर योजनेची प्रस्तावात नमूद केलेली कामे जिल्हा परिषद, लातूर मार्फत पूर्ण करण्यात आल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती व योजनेचे व्यवस्थापन संबंधित ग्रामपंचायतमार्फत करणे आवश्यक राहील.
९) योजनेचे काम मुदतीत पूर्ण होणे आवश्यक असल्याने योजनेच्या निविदा प्रक्रीयेपासून ते योजनेतून पाणीपुरवठा सुरु होईपर्यंत आठवडयाच्या प्रत्येक सोमवारी प्रगती अहवाल शासनास पाठविण्यात यावा.

२. **याबाबत होणारा खर्च "मागणी क्र. वाय-२, मुख्य लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १९६ जिल्हा परिषद पंचायत / संस्थांना सहाय्य, ०२ जिल्हा परिषदांना अनुदान, (०२)(०३) आकस्मिक पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या तात्पुरत्या उपाययोजनांसाठी जिल्हा परिषदांना सहायक अनुदान (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ ए १९५) " या लेखाशीर्षांखाली मंजूर असलेल्या तरतूदीतून भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५०८११०२४४४१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVINKUMAR GULABRAO PAWAR

Digitally signed by PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=5d2dad0f66e8336730e2b666877a365c20f60db099de815eecadde01ca77f148, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8F18625ADB482A7EE2512CEA93CE697388C95A99C89E41E85C05A3DE8476488F, cn=PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
Date: 2024.05.08 14:42:31 +05'30'

**(प्रविणकुमार पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, महसूल ( मदत व पुनर्वसन) विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
६. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
७. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
८. विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर
९. जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर
१०. जिल्हाधिकारी, लातूर
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर
१२. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, लातूर
१३. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१४. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१५. निवड नस्ती (पापु-१४ )